**सामाजिक वनीकरण-मानव संसाधन विकास, प्रसिध्दी व विस्तार कार्यक्रम या योजनेसाठी सन २०१०-११ करीता पुरक मागणीद्वारे मंजूर निधी वितरणास मंजूरी.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलएफ-२०१०/प्र.क्र. १०३/जल-१२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १४ मार्च,२०११**

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.एसएलएफ-१८९२/प्र.क्र.१५९/जल-१४, दि.२८जाने., १९९३
२) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.एसएलएफ-२०१०/प्र.क्र.३९/जल-१२, दि.१६ एप्रिल, २०१०
३) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.एसएलएफ-२०१०/प्र.क्र.३९/जल-१२, दि.३१ ऑगस्ट,२०१०
४) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.एसएलएफ-२०१०/प्र.क्र.३९/जल-१२, दि. १२.११.२०१०
५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. पूरक- २०१०/प्र.क्र.२४० / अर्थसंकल्प -३, दि. ३० डिसेंबर, २०१०
६) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.असक-२०१०/प्र.क्र.८१/जल-११, दि.१२ जानेवारी ,२०११
७) संचालक,सामाजिक वनीकरण पुणे यांचे पत्र क्र.कक्ष-१/वाया/०९-१०/२०१०/२२५९/२०१०-११ दि.२२.१०.२०१०

**प्रस्तावना :**

सामाजिक वनीकरणाचे महत्व व वनीकरणाच्या पध्दतीची माहिती सामान्य नागरीकांना देऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याबाबत त्यांना उदयुक्त करण्यासाठी सामाजिक वनीकरणांतर्गत जाहीरात, विक्री, प्रशिक्षण व प्रसिध्दी हा कार्यक्रम सन १९९२-९३ पासून कार्यान्वित करण्यात आला आहे. सदर योजना सन २०१०-११ या आर्थिक वर्षात पुढे चालू ठेवण्यासाठी मान्यता देण्यात आली असून, याकरीता प्रथम टप्यात रु. १३०.०० लाख इतका निधी मंजूर करण्यात आला होता. सदर निधीपैकी ८०% निधी संदर्भ क्र. (२) (३) व (४) मधील शासन निर्णयान्वये टप्या-टप्याने वितरीत करण्यास मान्यता दिली आहे.

आता, सामाजिक वनीकरणांतर्गत **" जाहिरात व प्रसिध्दी प्रशिक्षण"** या योजनेकरीता सन २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये डिसेंबर,२०१० च्या हिवाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे रु.४०.००लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यास मान्यता दिली असून, सदर मंजूर निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सदर शासन निर्णयान्वये **जाहीरात व प्रसिध्दी प्रशिक्षण** या योजनेसाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरीता मूळ अर्थसंकल्पिय मंजूर निधी व पुरक मागणीद्वारे मंजूर झालेल्या निधीपैकी रु.४९.०० लाख इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**२.** सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरीता रु. ४९.०० लाख इतका निधी ( रुपये एकोणपन्नास लाख फक्त ) सदर योजनेवर खर्च करण्यासाठी संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३.	या योजनेअंतर्गत वरील मंजूर निधीतून विविध स्पर्धांचे आयोजन, सामाजिक वानिकि ग्राम जागृती कार्यक्रम, प्रसिध्दी कार्यक्रमांतर्गत चर्चासत्र, वनमहोत्सव कार्यक्रम, वृक्षदिंडी कार्यक्रम, महत्वाचे विविध दिन साजरे करणे, एस.टी./रेल्वेचे माध्यमातून सामाजिक वनीकरणाची जाहिरात, दूरदर्शन/आकाशवाणीसाठी प्रायोजित कार्यक्रम तयार करुन त्याचे प्रसारण करणे, वनश्री पुरस्कार वितरण कार्यक्रम, इत्यादि कामे तसेच, उपसंचालक, सहा. संचालक, लागवड अधिकारी व सामाजिक वनीकरण मजूर यासाठी आणि शेतक-यांसाठी विविध प्रशिक्षणे घेण्याचे व निसर्ग शिक्षण केंद्र निर्मिती व तंत्राज्ञान हस्तांतरण इत्यादि कामे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४.	सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी हे संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदरहू निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. उपरोक्त निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास संचालक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. जिल्हानिहाय तरतुद वितरणाची माहिती शासनास पाठविण्यात यावी. तसेच राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा व झालेल्या खर्चाचा तपशील देखिल शासनास सादर करण्यात यावा.

५.	सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.एल-३, २४०६ वनीकरण व वन्यजीवन ००१-संचालन व प्रशासन - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना- ००१ (०२) (०१) संचालक, सामाजिक वनीकरण व वनसंरक्षक (पुणे) (२४०६ १६४६)- २६ जाहीरात व प्रसिध्दी, ५०-इतर खर्च (प्रशिक्षण) योजनांतर्गत-दत्तमत**

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक - **२०११०३१५१७३४५२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( श्या. र. चौरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व सहसंचालक , सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
कार्यासन अधिकारी, व्यय-१५,अर्थसंकल्प ३ व ४, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र.१४३२, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व) , ग्रा.वि.व ज.सं.वि.,मंत्रालय,मुंबई-३२
निवडनस्ती/जल-१२.